सरकारच्या मुख्याकडून हुकूम घेतला होता. यामुळेंच गोदीचें काम प्रथम सुरूकरणें त्यांस भाग पडलें.

ह्याचवर्षी कंपनीसरकारानें लंडन शहराहून मिस्तर वार्डविक् पिट नांवाच्या एका इंग्रज इंजनराास पाठवून दिला. यानें कांहीं तारवें तयार केलीं. पुढें सन १७३५ मध्यें हें काम शेट लवजी नसरवानजी वाडिया याजकडे सोंपिलें. हे प्रख्यात पारशी गृहस्थ प्रथम सुरत एथें कंपनीच्या खात्यांत लहानसान जहाजें बांधीत असत. ह्या नामांकित पुरुषानें ह्या कामांत मोठी हुशारी व प्रमाणिकपणा दाखविला व पुष्कळ तिर्कटी तारवें बांधिलीं. हें काम अद्याप त्याचे घराण्यांतच चाललें आहे. ह्या वेळीं ही गोदी लहान होती. मग कांहीं वर्षांनीं वाढवून मोठी केली. ह्या गोदींत १८१० मध्यें मियानी नांवाचें एक मोठें तिर्कटी लढाऊ जहाज बांधिलें होतें, त्याजवर ७४ तोफा राहत. तें बांधायास दहावर्षे लागलीं. व त्यास सात लक्ष रुपये खर्च झाला. दुसरीं जमना आणि नर्मदा अशी दोन लढाऊ तारवें बांधिलीं गेलीं. आणि हीं कोणी इंग्रजांच्या मदतीशिवाय ह्या पारशी गृहस्थानें बांधिलीं. या जहाजांची रचना अशी असते कीं, त्यां पुढें औरंगजेबाच्या तंबूचा थाट किंवा मयासुरानें रचलेली सभा कांहींच नाहीं. आंत अनेक तऱ्हेच्या खोल्या, त्यांत छप्परपलंग, खुरच्या, कोंची, हांड्या, झुंबर, आणि कपाटें, असतात. दोनतीन वर्षांमागें अमेरिकेहून मेनसोटा नांवाचें एक मोठें जहाज एथें आलें होतें. ते पांच मजली असून त्यांतील रचना राजवाड्यापेक्षां ही शतगुणित विशेष होती. त्यांत पुस्तकालयादि सर्व सरंजाम होता. यावर साठ सत्तर मोठ्या तोफा होत्या. हें पाहायास हजारो लोक जात होते. असें एक दुसरें कांहीं वर्षांमागें आलें होतें, त्यास आंतून सोन्याचा मुलामा काढला होता, त्याची राणीस भेट पाठविली होती.

मुंबईत आजपर्यंत सरकार खात्याचीं ५३ आणि सावकार लोकांचीं ८२ इतकीं जहाजें बांधिलीं. ह्या कारखान्यांत हल्लीं वाफेचीं यंत्रें चालू केलीं आहेत, त्यांची शक्ति अशी आहे. एक वीस घोड्यांच्या, दुसरें १० घोड्यांच्या जोरानें चालणारें. ह्याच्या योगानें लांकडें वेरितात. व दुसरें पितळी